**पेण पंचायत समिती जिल्हा रायगड प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर कामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१७/प्र.क्र. ९४/बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: **३०** जानेवारी,२०१९

वाचा :- **१)** शासन निर्णय क्र. पंसई २०१०/ प्र.क्र. १६८/ पंरा-**७** दि. २५.१०.२०१०
२) कार्यकारी अभियंता (बांध) , जिल्हा परिषद, रायगड यांचे पत्र कार्यकारी अभियंता (बांध) क्र. राजिप/बांखा/प्रकल्प शाखा-४/१२४००/२०१७, दि. ०२.०५.२०१७

प्रस्तावना :-

१. कार्यकारी अभियंता (बांध) , जिल्हा परिषद,रायगड यांनी संदर्भीय पत्रान्वये पेण पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर कामांस प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. पेण पंचायत समिती नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या एकूण रुपये **१८०.६४** लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास दिनांक **२५.१०.२०१०** च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येवून, प्रशासकीय मान्यते इतका पुर्ण निधी जिल्हा परिषदेला वितरीत करण्यात आला आहे. सद्य:स्थितीत पेण पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम पुर्ण झालेले असून पंचायत समितीच्या इमारतीस फर्निचरची अत्यंत आवश्यकता आहे. प्रशासकीय इमारत बांधकामाच्या मुळ प्रस्तावामध्ये फर्निचर व्यवस्था अंतर्भुत करण्यात आलेली नसल्यामुळे कार्यकारी अभियंता (बांध) जिल्हा परिषद रायगड यांनी इमारतीतील सर्व कार्यालयासाठी ऑफीस टेबल, खुर्च्या, फायलींग स्टोरेज टेबल, व्हीजीटर चेअर, मा. सभापती, उपसभापती यांच्या दालनासाठी कारपेट मॅटींग इत्यादी बाबींचा समावेश असलेले एकूण रुपये **३७**,०५,४८१.५०/- इतक्या किंमतीचे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता (बांध) जि.प. रायगड यांनी साक्षांकीत केले आहे.

३. कार्यकारी अभियंता (बांध) , जिल्हा परिषद,रायगड यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, पेण पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर कामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत रुपये ३७.०**६** लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

५. पेण पंचायत समिती जिल्हा रायगड पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर कामांस एकूण रक्कम रुपये ३७,०६,०००/-(रुपये सदोतीस लक्ष सहा हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) पेण पंचायत समितीच्या ठिकाणी, शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६ /प्र.क्र.१७२/ इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

६. पेण पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या अंतर्गत फर्निचर कामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| FINAL GENRAL ABSTACT FOR PEN P.S. FURNITURE WORKS | | |
|---|---|---|
| Sr. | Description of item | Cost Rs. |
| 1 | Cost of Furniture works | 3632825.00 |
| 2 | Add For Architecture Charges 2 % | 72656.50 |
| | Total Rs. | 3705481.50 |
| | Says Rs. | 3706000.00 |

**७. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.**

८. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०१३०१०४०४०३६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e437 2f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1f a4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.01.30 10:52:40 +05'30'

( दि.बा पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त कोकण, विभाग कोकण
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो., मध्यवर्ती इमारत, पुणे
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड
६) कार्यकारी अभियंता (बांध) , जिल्हा परिषद रायगड
७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद रायगड
८) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद रायगड
९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा रायगड
१०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
११) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा रायगड विभाग,रायगड
१२) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,रायगड
१३) सभापती, पंचायत समिती, पेण जिल्हा रायगड
१४) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पेण जिल्हा रायगड
१५) निवडनस्ती-बांधकाम-४